# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरूस्ती-१०१८/प्र.क्र.३६६/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०३ जानेवारी २०१९.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील वांद्रे पोलीस ठाणे याची इमारत व तेथील *"Lock up"* इमारत यांच्या संरचनात्मक दुरूस्तीसाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(११)/शा.२१९/२०१८, दिनांक १२.०९.२०१८.

**ज्ञापन.-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी वांद्रे पोलीस ठाणे याची इमारत व तेथील *"Lock up"* इमारत यांच्या संरचनात्मक दुरूस्तीसाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप विभागीय अभियंता, अंधेरी (सा.बां.) उप विभाग, मुंबई, यांनी सन २०१७-१८ च्या राज्य ई-दरसूचीनुसार तयार केलेले एकूण रु.४९,७८,४१७/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले असून ते कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बां.) विभाग, मुंबई, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते पुढील तक्त्यात निर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण रु.४७,२७,१६५/- अशी सुधारित केले आहेत आणि त्याप्रमाणे, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

| अ.क्र. *(१)* | कामाचे नाव *(२)* | खर्चाचे अंदाज *(३)* |
|---|---|---|
| १. | *"MOW to structural repairs to Bandra Police Station, Hill Road, Bandra (West)."* | रु.२०,१८,७१५/- |
| २. | *"MOW to structural repairs to Bandra Police Station Lock up, Hill Road, Bandra (West), Mumbai."* | रु.२७,०८,४५०/- |
| **एकूण-** | | **रु.४७,२७,१६५/-** |

४. त्या अनुसार, वांद्रे पोलीस ठाणे याची इमारत व तेथील *"Lock up"* इमारत यांच्या संरचनात्मक दुरूस्तीसाठी, परिच्छेद ३ मधील तक्त्यातील स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे, एकूण रु.४७,२७,१६५/- *(रुपये सत्तेचाळीस लक्ष, सत्तावीस हजार, एकशे पासष्ट रुपये फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.
२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७८/१८/इमा.-२, दिनांक १९.१२.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०८११२७१४००२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.01.08 11:36:13 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**
१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई*(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "Recapitulation sheet" च्या प्रतीसह).*
२) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सा.बां.) विभाग, मुंबई *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "Recapitulation sheet" च्या प्रतीसह).*
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).